महिला व बाल विकास विभागांतर्गत क्षेत्रिय आस्थापनेवरील गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विशेष कारणास्तव बदली करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांक : मबाआ-२०२३/प्र.क्र.६५/का.७ अ**

हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दि.१५ मार्च,२०२४.

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अमलात आले आहेत. सदर अधिनियमातील कलम ४(४)(दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी /बाल विकास प्रकल्प अधिकारी(ग्रामीण)/अधीक्षक,शासकीय संस्था /निरीक्षक,प्रमाणित शाळा व संस्था व तत्सम पदे या गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विशेष कारणास्तव बदलीस सक्षम प्राधिकारी यांच्या लगतपूर्व वरिष्ठ प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमूद त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक- ३ मध्ये दर्शविल्यानुसार पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.गणेश लहु कुकडे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), कुरखेडा, जि.गडचिरोली | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), परांडा, जि.उस्मानाबाद | रिक्त पदावर |
| २ | श्रीमती कविता दिगंबर पाटील, बाल विकास प्रकल्प अधिकारी,(ग्रामीण) दहिवेल ता.साक्री जि.धुळे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रा), निफाड (पिंपळगाव)-२,जि. नाशिक | रिक्त पदावर |
| ३ | श्रीमती रुपाली धुमाळ, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), पालघर (मनोर) | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),कोपरगाव जि.अहमदनगर | रिक्त पदावर |
| ४ | श्री.राजेश बबन वाघ, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), खामगांव, जि.बुलढाणा | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), चिखली, जि.बुलढाणा | रिक्त पदावर |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | श्रीमती वैशाली सुरेश सटाले (झेंडे),<br><br>बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),राजुरा जि.चंद्रपूर | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), शिरुर-२, जि.पुणे | रिक्त पदावर |
| ६ | कु.प्रियंका हरिश्चंद्र गवळी,<br><br>बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), वाशिम, जि.वाशिम | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), फलटण, जि.सातारा | रिक्त पदावर |
| ७ | श्रीमती माधुरी सुकुमार भंडारे,<br><br>बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रा) ब्रह्मपुरी जि.चंद्रपूर | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),<br><br>औरंगाबाद-२, जि.औरंगाबाद | रिक्त पदावर |
| ८ | श्री.किशोर साहेबराव पगारे,<br><br>बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),धडगांव, जि.नंदुरबार | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),<br><br>जुन्नर, जि.पुणे | रिक्त पदावर |
| ९ | श्री.अभिजित अरुण मोलाणी,<br><br>बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), मोलगी ता.अक्कलकुवा जि.नंदुरबार | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),<br><br>सांगोला, जि.सोलापूर | रिक्त पदावर |
| १० | श्री.कुणाल सुभाषराव धुमाळ,<br><br>बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), दौंड-२ ता.दौंड जि.पुणे | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),<br><br>उरळीकांचन, जि.पुणे | रिक्त पदावर |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. संबंधित अधिकाऱ्यांनी अन्य आदेशाची वाट न पाहता बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन त्याबाबतचा अहवाल आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे, आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई व शासनास desk7a.wcd-mh@mah.gov.in या ई-मेल वर सादर करावा.

३. उपरोक्त अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

४. उपरोक्त अधिकाऱ्यांना पुर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने त्यांचा कोणत्याही प्रकारचा रजेचा अर्ज स्विकारू नये.

५. उपरोक्त अधिकारी यांना बदलीच्या पदावर रूजू करून घेताना, ते रजेवर /गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करून घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करून घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरून घ्यावा आणि नंतर हजर करून घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय/परिपत्राकांतील निर्देशांचे पालन करावे.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेततर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, उपरोक्त अधिकारी यांनी बदलीच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी, अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या ठिकाणी रूजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यादिन (dies non) म्हणून गणला जाईल.

७. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या बदली ही विनंतीनुसार असल्याने त्यांना प्रवास भत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१८३६३७६९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2024.03.15 19:06:50 +05'30'

**(रा. ता. भालवणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,महिला व बाल विकास विभाग यांचे खाजगी सचिव
२. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
३. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
४. मा.सचिव,(म.व बा.वि.वि.), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (आयुक्तालयामार्फत)
६. संबंधित विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास विभाग (आयुक्तालयामार्फत)
७. महालेखापाल १ /२ (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई/नागपूर (आयुक्तालयामार्फत)
८. संबंधित अधिदान व लेखाधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
९. संबंधित अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
१०. निवडनस्ती (कार्यासन-७ अ).